**शासन निर्णय दि. २१.०३.२०२५ व दि.१७.०४.२०२५ अन्वये गठीत केलेल्या समितीच्या अध्यक्षांना व समितीतील निवृत्त अधिकारी सदस्य यांना देण्यात येणा-या बैठक भत्त्याच्या रक्कमेत वाढ करण्याबाबत -**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. समिती-२०२५/प्र.क्र.६७/तांशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू
चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २३ मे, २०२५.

**संदर्भ :-** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.समिती-२०२५/प्र.क्र.४८/तांशि-४, दि.२१.०३.२०२५.
२) शासन समक्रमांक दि.१७.०४.२०२५ रोजीचा शासन निर्णय.
३) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. २/एनजीसी/समिती मानधन व NRI व्याख्या/३०८, दि.०५.०५.२०२५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ मधील तरतुदीनुसार प्रवेश नियामक प्राधिकरण (ARA), राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष (CET CELL) व शुल्क नियामक प्राधिकरण (FRA) यांच्या नियम व विनियम यांचे प्रारूप तयार करण्याकरीता संदर्भ क्र. १ येथील दि.२१.०३.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली आहे.

तसेच उपरोक्त अधिनियमाची कार्यपध्दती, वेळोवेळी अमंलबजावणी करतांना आलेल्या अडचणी व त्यावरील उपाययोजना विचारात घेऊन सदर अधिनियमाचे पुनर्विलोकन करून सुधारीत अधिनियमाचे प्रारूप तयार करून शासनास सादर करण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली आहे.

सदर दोन्ही समितीच्या अध्यक्षांना व समितीतील निवृत्त अधिकारी सदस्य यांना देण्यात येणा-या बैठक भत्त्याच्या रक्कमेत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे :-

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन दि.२१.०३.२०२५ व दि.१७.०४.२०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या दोन्ही समितींचे अध्यक्ष यांच्या बैठकभत्त्याच्या रक्कमेत “रु.७,५००/-” वरुन “रु.१०,०००/-” व दोन्ही समितीमधील निवृत्त अधिकारी सदस्य यांच्या बैठकभत्त्याच्या रक्कमेत “रु.५,०००/-” वरुन “रु.९,०००/-” अशी वाढ करण्यात येत आहे.

२. सदर दोन्ही शासन निर्णयातील इतर तरतुदी ह्या आहेत त्याप्रमाणे लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०५२३१५३३५०९९०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=891b9227cbfc5a688b110ab53810ab4d94960474021325e10e794cb784d2e6a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7113210379DB8F8304AC958953787A4C6EC1B3F193419BA4C6971FA4CD5F15E, cn=THORAT AJITKUMAR ARUNRAO
Date: 2025.05.23 15:35:03 +05'30'

**( अजितकुमार थोरात )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) श्री.राजेंद्र भागवत, से.नि. प्रधान सचिव. (संचालक, तंत्र शिक्षण यांच्या मार्फत)
४) सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण तथा आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) श्री.डी.पी.गोमारे, निवृत्त विधी सल्लागार-नि-सहसचिव. (संचालक, तंत्र शिक्षण यांच्या मार्फत)
९) सह सचिव (तंत्र शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (तांशि-४)